राज्य आणि जिल्हा मुख्य साधन संस्थांच्या
कार्यान्वयासाठी मार्गदर्शक सूचना

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः केआरसी ३६१५/प्र.क्र. ०४ /पापु-०८

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: १७ जानेवारी, २०१५.

**वाचा -**

**या विभागाचा शासन निर्णय क्रमांकः केआरसी-३६१४/प्र.क्र.१२/पापु-०८, दि.१ सप्टेंबर, २०१४**

## प्रस्तावना

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने दि. ०१ सप्टेंबर २०१४ रोजी ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमासाठी मुख्य साधन संस्थांची निवड केलेली आहे. याद्वारे निर्मल भारत अभियान, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, जलस्वराज्य कार्यक्रम - २ इत्यादी महत्वाच्या कार्यक्रमांच्या अंमलबजावणीमध्ये विभागाला मदत करण्यासाठी विविध विषयाच्या अनुषंगाने मुख्य साधन संस्थांचा जिल्हा आणि राज्यस्तरावर सहभाग घेण्यासाठी कशाप्रकारे काम करावे याबाबत शासनस्तरावर मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक

मुख्य संसाधन संस्थांच्या सहभागाने आवश्यक सर्व कामांकरिता निविदा प्रक्रियेसाठी मार्गदर्शक सूचना -
पाणी, पुरवठा व स्वच्छता विभागाने दि. ०१ सप्टेंबर २०१४ रोजी ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमासाठी मुख्य साधन संस्थांची निवड केलेली आहे. याद्वारे स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) (यापूर्वीचे निर्मल भारत अभियान), राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, जलस्वराज्य कार्यक्रम - २ इत्यादी महत्वाच्या कार्यक्रमांच्या अंमलबजावणीमध्ये विभागाला मदत करण्यासाठी विविध विषयाच्या अनुषंगाने मुख्य साधन संस्थांचा जिल्हा आणि राज्यस्तरावर सहभाग घेण्यासाठी या शासन निर्णयामध्ये विविध घटकांचा समावेश करण्यात आलेला आहे. शासन निर्णयातील क्षमता बांधणी उपक्रमांतर्गत काही उपक्रम, मुल्यमापन सनियंत्रण व पर्यवेक्षण, संशोधनात्मक कामे, तंत्रज्ञान, दस्ताऐवजीकरण इत्यादी कामांसाठी मुख्य साधन संस्थेची निवड करताना पुढीलप्रमाणे अंतर्गत निविदा प्रक्रिया राबविण्यात येईल.

१. विशेष उपक्रम किंवा प्रकल्प संबंधित राज्यस्तरीय किंवा जिल्हा मुख्य साधन संस्थेकडून करुन घ्यावयाच्या कामाचा तपशिल (ToR) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था किंवा जिल्हा कक्ष तयार करेल.
२. विशेष उपक्रम किंवा प्रकल्प राबविण्यासाठी अंतर्गत निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी किमान ८ राज्य किंवा जिल्हा मुख्य साधन संस्थांकडून स्वारस्य प्रस्ताव मागविण्यात यावेत.
३. मुख्य साधन संस्था आपला स्वारस्य प्रस्ताव ई-मेलद्वारे सादर करतील.

४. स्वारस्य दाखविणाऱ्या संस्थांना कार्यक्रमासंबंधीच्या अटी व शर्थी (ToR) उपलब्ध करुन दिल्या जातील.

५. मुख्य साधन संस्था विहित कालावधीत प्रत्यक्ष बंद लिफाफयामध्ये आपले तांत्रिक व आर्थिक प्रस्ताव सादर करतील.

६. जिल्हा स्तरावरील छाननी समितीकडून सर्वप्रथम तांत्रिक प्रस्तावाची छाननी केली जाईल आणि पहिल्या ३ तांत्रिक प्रस्तावासंदर्भात पुढील आर्थिक प्रस्तावांची छाननी केली जाईल.

७. संस्था निवड करताना तांत्रिक प्रस्तावाला ६०% आणि आर्थिक प्रस्तावाला ४० % महत्त्व दिले जावे.

८. तांत्रिक प्रस्तावाची छाननी करताना पुढील मार्गदर्शक तत्वाचा अवलंब करावा.

९.आर्थिक प्रस्तावाची छाननी करताना पुढील पद्धतीचा अवलंब करावा.

**तांत्रिक व आर्थिक निविदांना गुणवितरण करण्यासाठी उदाहरण-**

| **अ.क्र.** | **तपशिल** | **गुण निकष** | **प्राप्त गुण** |
|---|---|---|---|
| १. | अटी व शर्थीनुसार (ToR) परिपूर्ण प्रस्तावाचे सादरीकरण. | १० | |
| २. | संस्थेचा संबंधीत कामाचा पूर्वानुभव | २० | |
| ३. | सदर काम करणेसाठी संस्थेकडे उपलब्ध असणारे मनुष्यबळ | १५ | |
| ४. | संस्थेकडे सदर कामाशी संबधीत भौतिक साधनांची उपलब्धता | ५ | |
| ५. | अटी व शर्तीनुसार (ToR) संस्थेची आर्थिक क्षमता | १० | |
| | **एकूण** | **६०** | |

१) समजा अ,ब,क,ड,ई,फ या सहा निविदाकारांच्या तांत्रिक व आर्थिक निविदा प्राप्त झाल्या.

२) यापैकी समजा तांत्रिक मुल्याकनात गुणानुक्रम खालीलप्रमाणे ठरले.

ब - १
ड - २
अ - ३
इ - ४
फ - ५
क - ६

३) प्रथम क्र. १,२,३ गुणानुक्रमे निवडूण त्यांचेकडून सविस्तर सादरीकरण घ्यावे व ३ गुणानुक्रमे निश्चित करुन क्र. १ ला ६० गुण धरुन इतरांना त्याप्रमाणात कमी गुण घ्यावेत. समजा ते खालीलप्रमाणे मिळाले आहेत.

(i) ब- १ - ६० गुण

(ii) ड- २ - ५० गुण

(iii) अ- ३ - ४५ गुण

४) त्यानंतर वरील तीन निविदाकारांचे आर्थिक प्रस्ताव उघडावे, समजा ते खालीलप्रमाणे आहेत.

ब- रु. ५ लाख

ड- रु. ४ लाख

अ- रु. ४.५ लाख

या संस्थांपैकी सर्वात कमी आर्थिक निविदा असलेल्या ड निविदाकारास ४० गुण द्यावेत. इतर दोघांना खालीलप्रमाणे गुण द्यावेत.

ब- $\frac{\text{ड ची निविदा रक्कम}}{\text{ब ची निविदा रक्कम}} \times ४० \quad \frac{४}{५} \times ४० = ३२$ गुण

अ- $\frac{\text{ड ची निविदा रक्कम}}{\text{अ ची निविदा रक्कम}} \times ४० \quad \frac{४}{४.५} \times ४० = ३५.६$ गुण

५) अंतिम मुल्यांकन खालीलप्रमाणे ठरेल.

| निविदाकार | तांत्रिक गुण | आर्थिक गुण | एकूण | अंतिम गुणानुक्रम |
|---|---|---|---|---|
| अ | ४५ | ३५.६ | ८०.६ | ३ |
| ब | ६० | ३२.० | ९२.० | १ |
| ड | ५० | ४०.० | ९०.० | २ |

उपरोक्त उदाहरणानुसार ज्या निविदाकाराचे अंतिम गुण जास्त असतील त्यांची निविदा मान्य करावी. म्हणजेच ब ची रु. ५ लाखाची निविदा मान्य होईल.

त्या निविदाकारांशी वाटाघाटी करुन निविदा अंतिम करता येईल किंवा नाकारता येईल. मात्र निविदा नाकारल्यास पुन्हा नव्यानेच वरीलप्रमाणे संपूर्ण प्रक्रिया (किमान ८ संस्थांकडून पुन्हा तांत्रिक व आर्थिक प्रस्ताव मागविण्यापासून) करावी लागेल.

**<u>राज्यस्तर व जिल्हास्तरावरील मुख्य साधन संस्थांना संशोधनात्मक काम करण्यासाठी संभाव्य घटकांची यादी</u>**

पाणी व स्वच्छता क्षेत्रात प्रक्रिया, परिणाम, तंत्रज्ञान विकास इत्यादी संबंधी मुख्य प्रधान साधन संस्था व राज्य मुख्य साधन संस्थाकडून संशोधनात्मक काम करुन घेण्यात येईल. यासाठी संभाव्य विषय पुढील प्रमाणे असतील.

| अ.क्र. | संशोधनाचे क्षेत्र | तपशिल |
|---|---|---|
| १ | स्वच्छता विषयक तंत्रज्ञान | • दोन खड्डयाच्या शौचालयाचे अस्तित्वात असलेल्या तंत्रज्ञानात सुधारणा<br>• घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापनासाठी कमी खर्चाचे, पर्यावरण पुरक व उपयुक्त तंत्रज्ञान |
| २ | पिण्याच्या पाण्याविषयक तंत्रज्ञान | • जल शुध्दीकरण, हाताळणी, उपसा, साठवण आणि वितरण व्यवस्थे संबंधीचे तंत्रज्ञान |
| ३ | प्रक्रिया | • पाणी व स्वच्छतेसंबंधीतातील उपक्रम अंमलबजावणी दरम्यानच्या तांत्रिक प्रशासकिय, सामाजिक, आर्थिक प्रक्रियांचा अभ्यास |
| ४ | परिणाम | • पाणी व स्वच्छतेसंबंधातातील उपक्रम अंमलबजावणीचा सामाजिक आरोग्य, सामाजिक वर्तन, लोकसहभाग, भौतिक सूविधा वापर व देखभाल दुरुस्ती, आर्थिक इत्यादी बाबतच्या परिणामाचा अभ्यास |

**<u>मुख्य साधन संस्थांच्या मदतीने प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येणार असल्यास त्यासंबंधीच्या मार्गदर्शक सूचना</u>**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने दि. ०१ सप्टेंबर २०१४ रोजी ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमासाठी मुख्य साधन संस्थांची निवड केलेली आहे. याद्वारे निर्मल भारत अभियान, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, जलस्वराज्य कार्यक्रम - २ इत्यादी महत्वाच्या कार्यक्रमांच्या अंमलबजावणीमध्ये विभागाला मदत करण्यासाठी विविध विषयाच्या अनुषंगाने मुख्य साधन संस्थांचा जिल्हा आणि राज्यस्तरावर सहभाग घेण्यासाठी या शासन निर्णयामध्ये विविध घटकांचा समावेश करण्यात आलेला आहे. शासन निर्णयातील क्षमता बांधणी उपक्रमांतर्गत जे विविध प्रकारच्या प्रशिक्षणांचे आयोजन करण्यात येणार आहे. त्यासंबंधीच्या मार्गदर्शक सूचना पुढील प्रमाणे असतील.

१. प्रशिक्षणासाठी गरजेनुसार पुरेसे प्रशिक्षण साहित्य उपलब्ध असणे आवश्यक राहिल.
२. प्रशिक्षणासाठी सुयोग्य प्रशिक्षण कक्ष, पुरेसा प्रकाश, पिण्याचे पाणी आणि स्वच्छतेची व्यवस्था उपलब्ध असणे तसेच इंटरनेट कनेकशनची सुविधा, प्रोजेक्टर, संगणक / लॅपटॉप, जनरेटर, कॅमेरा, वाचन साहित्य, नोट पॅड आणि पेन इत्यादी साहित्य आवश्यक राहिल.
३. प्रशिक्षणार्थी विषयानुरुप अनुभवी व तज्ञ साधन व्यक्तींचा सहभाग आवश्यक आहेत.
४. प्रशिक्षणा दरम्यान प्रशिक्षणार्थींना वाचनीय साधन साहित्याची उपलब्धता असावी.
५. निवासी प्रशिक्षणात सुरक्षित स्वच्छ व किमान सुविधायुक्त निवास व्यवस्था असावी. महिला व पुरुषांसाठी स्वतंत्र निवास व्यवस्था उपलब्ध करुन द्यावी.
६. प्रत्येक प्रशिक्षणाचा स्वतंत्र आणि सचित्र अहवाल आयोजक संस्थेने सादर करावा.
७. अहवालासोबत प्रशिक्षणार्थींच्या स्वाक्षरीसह उपस्थितीपत्रक जोडलेले असावे.
८. प्रशिक्षणासाठी प्रशिक्षणार्थींना सूचना देवून ते उपस्थितीत राहतील याची जबाबदारी संबंधित जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षातील मनुष्यबळ विकास सल्लागार / क्षमता बांधणी तज्ञ यांच्यावर राहिल.
९. प्रशिक्षक मुख्य साधन संस्थेला प्रशिक्षणास अत्यल्प प्रतिसाद (किमान १२ पेक्षा जास्त आणि २५ पेक्षा कमी) मिळाल्यास प्रत्येक प्रशिक्षणासाठी किमान २५ प्रशिक्षणार्थी गृहित धरुन निधी वितरीत केला जाईल.

**मुख्य साधन संस्थांनी करावयाच्या मूल्यमापन ,सनियंत्रण आणि तपासणी संबंधी कामाबाबत मार्गदर्शक सूचना दि.१ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट ०४ करिता**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या विविध कार्यक्रमात प्रभावी मूल्यमापन, सनियंत्रण व तपासणी पद्धतींचा अवलंब करून विभागाच्या कार्यक्रमाची परिणामकारकता वाढविण्यासोबत आवश्यक सुधारणा करण्याच्या संधी समोर येण्याच्या दृष्टीने या कामात मुख्य साधन संस्थांना सहभागी करून घेण्याची तरतूद दि.१ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट ०४ मध्ये करण्यात आली आहे.

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या विविध उपक्रमांतर्गत मुल्यमापन, सनियंत्रण आणि तपासणीचे काम मुख्य प्रधान साधन संस्था व राज्य मुख्य साधन संस्थांना करता येईल. तपासणी ,मुल्यमापन आणि सनियंत्रनाच्या कामामध्ये मुख्य प्रधान साधन संस्था व राज्य मुख्य साधन संस्थाना सहभागी करून घेण्यासाठी निर्धारित नियमांच्या अधीन राहून राज्य किंवा जिल्ह्याकडून अंतर्गत निविदा अथवा दरपत्रक पद्धतीचा अवलंब केला जाईल. केंद्र व राज्य सरकारच्या सूचनानुसार करावयाच्या तपासणी कामासाठी त्या त्या सुचणे सोबत दर निश्चित केलेले असल्यास तेच ग्राह्य धरून काम दिले जाईल.

अशा प्रकारचे काम करून घेताना संबंधित कार्यालयीन कामाचे स्वरूप स्पष्टपणे नमूद असणाऱ्या टिपणीसह सूचना मुख्य प्रधान साधन संस्थांना व राज्य मुख्य साधन संस्थाना निर्गमित करेल आणि

स्वारस्य प्रस्ताव मागवेल आणि नियमानुसार अंतर्गत निविदा किंवा दरपत्रक पद्धतीचा अवलंब करून त्या त्या कामासाठी मुख्य प्रधान व राज्य मुख्य साधन संस्थां सोबत करार करेल.

जिल्हास्तर मुख्य साधन संस्था जिल्हास्तरावर निर्मल ग्राम पुरस्कारासाठी प्राप्त प्रस्तावांची तपासणी करू शकतील आणि त्यासाठी राज्यस्तरावर निर्धारित केलेल्या दरानुसार निधी वितरीत केला जाईल. निर्मल ग्राम पुरस्कारासाठी प्राप्त प्रस्तावांची राज्यस्तर तपासणी केवळ मुख्य प्रधान साधन संस्था व राज्य मुख्य साधन संस्थाना करता येईल. या तपासणीची पद्धती, प्रमाण आणि दर प्रतिवर्षी राज्यस्तरावरून निश्चित केले जातील .

सामान्यतः पुढील प्रकारची कामे मुल्यमापन,सनियंत्रण आणि तपासणी अंतर्गत करता येवू शकतील तसेच या व्यतिरिक्त देखिल गरजेनुसार व कामाच्या स्वरूपानुसार प्रधान,राज्य व जिल्हा मुख्य साधन संस्थाना मुल्यामापन,सनियंत्रण आणि तपासणीच्या वेगवेगळ्या कामात सहभागी करून घेता येईल.

| **कामाचे स्वरूप** | **अंतर्गत संभाव्य कामे** |
|---|---|
| मूल्यमापन | विविध स्तरावरील प्रशिक्षण कार्यक्रम ,कार्यशाळा,मेळावे,विशेष अभियान ,विविध घटक अंमलबजावणी परिणाम ,अंमलबजावणी प्रक्रिया ,संसाधन व्यवस्थापन,संवाद साहित्य ई. |
| सनियंत्रण | विविध घटक अंमलबजावणी प्रक्रिया,भौतिक साधन निर्मिती गुणवत्ता ,माहिती व्यवस्थापन ,विविध स्तरावरील नियोजन आराखडे ई. |
| तपासणी | निर्माण केलेली भौतिक साधने, विविध पुरस्कारांसाठी आलेले प्रस्ताव,विविध स्तरावर होत असलेली वेगवेगळ्या घटकांची अंमलबजावणी ई. |

या उपक्रमांतर्गत मुख्य साधन संस्थांनी करारातील अटींमध्ये अंतर्भूत बाबींसह उपक्रमादरम्यान गरजेनुसार आणि उपक्रम पूर्ण झाल्या नंतर केलेल्या कामाचा सविस्तर अहवाल करार केलेल्या कार्यालयात सादर करणे आवश्यक राहील. उपक्रम अहवालात सविस्तर वर्णनासह छायाचित्रे ,आवश्यक त्या याद्या आणि संदर्भ ई .सादर करणे गरजेच राहील.

**समाज संघटनाच्या माध्यमातून लोकसहभाग वाढविण्यासाठी उपक्रम आयोजनात मुख्य साधन संस्थांनी करावयाच्या कामासंबंधी मार्गदर्शक सूचना**

**दि.१ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट ०८ करिता**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या विविध कार्यक्रमाच्या यशात लोकसहभागाची भूमिका महत्वाची आहे. राज्यातील अनेक गावामधून पाणी पुरवठा व स्वच्छता संबंधी जे आदर्श काम उभे राहू शकले, त्यामध्ये लोकसहभागाचा भक्कम आधार होता हे पुर्वानुभावाधारे स्पष्ट होते. या पार्श्वभूमीवर समाज संघटनाच्या माध्यमातून पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमातील लोकसहभाग वाढविण्यासाठी उपक्रम आयोजनात मुख्य साधन संस्थांना सहभागी करून घेण्याची तरतूद शासन निर्णयाद्वारे करण्यात आली आहे.

या उपक्रमांतर्गत राज्य व जिल्हा मुख्य साधन संस्थाना समाज संघटनाच्या आणि त्या माध्यमातून लोकसहभाग निश्चित करण्याच्या कामात सहभागी होता येईल. **समाज संघटनाच्या माध्यमातून पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमातील लोकसहभाग वाढविण्यासाठी उपक्रमात राज्य व जिल्हा मुख्य साधन संस्थाना सहभागी करून घेण्यासाठी निर्धारित नियमांच्या अधीन राहून राज्य किंवा जिल्ह्याकडून अंतर्गत निविदा अथवा दरपत्रक पद्धतीचा अवलंब केला जाईल. लोकसहभागासाठी** राज्य स्तरावरून विशेष उपक्रम आयोजित केला जाणार असल्यास त्या सोबत त्या स्तरावरून निश्चित केलेले दर सहभागी मुख्य साधन संस्थाना लागू राहतील.

अशा प्रकारचे काम करून घेताना संबंधित कार्यालयीन कामाचे स्वरूप स्पष्टपणे नमूद असणाऱ्या टिपणीसह सूचना राज्य व जिल्हा मुख्य साधन संस्थाना निर्गमित करेल आणि स्वारस्य प्रस्ताव मागवेल आणि नियमानुसार अंतर्गत निविदा किंवा दरपत्रक पद्धतीचा अवलंब करून त्या त्या कामासाठी प्रधान व राज्य मुख्य साधन संस्थां सोबत करार करेल.

सामान्यतः पुढील प्रकारची कामे समाज संघटनाच्या माध्यमातून पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमातील लोकसहभाग वाढविण्यासाठी उपक्रमांतर्गत अपेक्षित आहेत. या व्यतिरिक्त देखिल गरजेनुसार व कामाच्या स्वरूपानुसार राज्य व जिल्हा मुख्य साधन संस्थाना समाज संघटनाच्या वेगवेगळ्या कामात सहभागी करून घेता येईल.

| **कामाचे स्वरूप** | **अंतर्गत संभाव्य कामे** |
|---|---|
| सामाजिक संघटन आढावा | विविध स्तरावरून मिळणारी माहिती व गावस्तरावर उपलब्ध सामाजिक संघटनांशी संपर्क करून त्याच्या कामाचे स्वरूप, क्षमता व सहभाग शक्यता पडताळून अहवाल तयार करणे |
| मेळावे | या उपक्रमात विविध स्तरावर मेळाव्यांचे आयोजन करता येईल. लोकसहभाग वाढविण्यास उपयुक्त समाज स्तरावर हे मेळावे पाणी व स्वच्छता क्षेत्रातील सामाजिक संघटना व विविध घटकांचा सहभाग वाढविणारे असावेत. |
| सामाजिक संघटना व पाणी स्वच्छता विभाग समन्वयन | प्रस्तावित कार्यक्षेत्रातील सामाजिक संघटना आणि पाणी स्वच्छता विभाग यांच्या दरम्यान समन्वयनासाठी बैठका आयोजित करणे.<br>सामाजिक संघटनासाठी पाणी व स्वच्छता क्षेत्र परिचय सत्र आयोजित करणे,संभाव्य सहभागाच्या शक्यता तपासण्यासाठी चर्चासत्र,कार्यशाळा,परिषदा आयोजित करणे . सामाजिक संघटना सहभागाचे स्वरूप ठरवून विभाग व संस्था यामध्ये औपचारिक संबंध प्रस्थापित करून देणे. |
| सामाजिक संघटन क्षमता बांधणी | सामाजिक संघटनांच्या पाणी व स्वच्छता विभागाच्या कार्यक्रमातील यशस्वी सहभागासाठी या संस्थाच्या कार्यकर्त्याकरिता क्षमता बांधणी उपक्रमाचे आयोजन करणे. |
| पाठपुरावा | सामाजिक संघटना प्रत्यक्ष सहभागी झाल्यानंतर त्यांच्या सहभागातील सातत्य आणि गुणवत्ता टिकून रहावी व त्या लोकसहभागाची पातळी उंचवावी यासाठी निरंतर पाठपुरावा, आढावा,क्षेत्रस्तर मार्गदर्शन ई. |

या उपक्रमांतर्गत मुख्य साधन संस्थांनी करारातील अटींमध्ये अंतर्भूत बाबींसह उपक्रमादरम्यान गरजेनुसार आणि उपक्रम पूर्ण झाल्या नंतर केलेल्या कामाचा सविस्तर अहवाल करार केलेल्या कार्यालयात सादर करणे आवश्यक राहील. उपक्रम अहवालात सविस्तर वर्णनासह छायाचित्रे, वृत्तपत्रातील संबंधित कात्रणे ,आवश्यक त्या याद्या, संदर्भ सादर करणे अनिवार्य राहील.

**गावपातळीवरील हागणदारी निर्मूलन नियोजन प्रक्रिया (ODEP) मार्गदर्शक सूचना - शासन परिपत्रक क्रमांक :-स्वभामि-२०१५/प्र.क्र.०५/पापु-०८, दि.१३ जानेवारी, २०१५ अन्वये देण्यात आलेल्या आहेत**

**निर्मल दूत कार्यान्वयण मार्गदर्शक सुचना**

**पार्श्वभूमि**

माहिती, शिक्षण संवाद हा निर्मल भारत अभियानाचा महत्वपूर्ण घटक असून या आधारे शाश्वत स्वच्छता प्राप्त करण्यासाठी मागणी आधारीत दृष्टीकोन निर्माण करता येईल असा विश्वास आहे. सदर बाब विचारात घेवून घरगुतीस्तरावर नि:पक्षपातपणे सुधारीत स्वच्छतेची मागणी तसेच तत्संबंधी महत्वकांक्षा निर्माण करण्याच्या दृष्टीने माहिती शिक्षण संवाद घटकाचा आणि अनुषंगीक विविध उपक्रमांची रचना त्या पद्धतीने निर्माण करण्यात आली आहे.

**सामाजिक आणि वर्तणूक बदलासाठीचा संवाद-** सुयोग्य माहितीच्या आधारे निर्णय घेणे, आरोग्यास हानीकारक असलेल्या स्वच्छता सवयींचा अवलंब न करणे, तसेच निरोगी रूढी आणि सवयी आचरणात आणण्याच्या दृष्टीने योग्य निर्णय घेण्यासाठी व्यक्ती तसेच कुटुंबाचे योग्यरीत्या सक्षमीकरण व्हावे हे राष्ट्रीय आरोग्य व स्वच्छता संवाद धोरणांचे (SHACS) मुख्य ध्येय आहे. या संवाद धोरणामध्ये प्रामुख्याने शौचालय बांधकाम व त्याचा शाश्वत वापर करणे , लहान मुलांच्या विष्ठेचे सुयोग्य व्यवस्थापन करणे, विशिष्ट काळात हात धुणे तसेच पिण्याच्या पाण्याची सुरक्षित हाताळणी व साठवण या चार प्रमुख बाबींवर लक्ष केंद्रीत करण्यात आले आहे.

केंद्र शासनाने निर्गमित केलेले हे वर्तणूक बदलाचे धोरण स्वीकारून महाराष्ट्र शासनाने दि ८ जुलै २०१४ रोजी मा. मुख्यमंत्री यांनी वर्तणूक बदलासाठीचे संवाद धोरण जाहीर केले आहे. या धर्तीवर राज्य शासनाने राज्यातील ज्या कुटूंबाकडे शौचालय नाही तसेच ज्या कुटूंबाकडे शौचालय आहे मात्र ते त्याचा नियमित वापर करीत नाहीत अशा सर्व जिल्हयातील कुटूंबांशी अंतरव्यक्ती संवाद साधन्यासाठीच्या मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या आहेत.

**आज स्वच्छते संबंधी जर चांगला बदल घडवून आणायचा असेल तर कौटूंबिक तसेच सामूदायीकस्तरावर वर्तणूकीत बदल घडवून आणून आरोग्यासंबंधी चांगल्या सवयींचा अवलंब करण्यासाठी संबंधित भागधारकांना प्रेरीत करावे लागेल. हा अपेक्षित बदल जर घडवून आणावयाचा असेल तर कौटुंबिक व गावपातळीवर योग्य उपाय योजनांची निश्चिती करून संबंधित भागधारकांशी सातत्याने संवाद साधावा लागेल आणि हे साध्य करण्यासाठी निश्चितच प्रशिक्षीत संवादकाची निवड करून या संवादकामार्फ़त प्रत्येक कुटुंबातील सदस्यापर्यंत पोहचणे महत्वाचे ठरणार आहे.**

सद्यस्थितीस विविध शासकीय विभागांच्या/योजनांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी (एएनएम, अंगणवाडी सेविका, शिक्षक इ.) गावपातळीवर प्रतिनिधी/कर्मचारी कार्यरत आहेत. मात्र स्वच्छतेच्या प्रसारासाठी सामुदायिक, गाव व कौटुंबिकस्तरावर प्रभावी व समर्पित अशी व्यवस्था आज गावपातळीवर उपलब्ध नाही. या बाबींचा विचार करून केंद्र शासनाने कौटूंबीक व समुदायस्तरावर स्वच्छता व आरोग्य संबंधीच्या वर्तणूक बदल घडवून आणून गावपातळीवर स्वच्छता सुविधांच्या निर्मितीसाठी आणि निर्माण झालेल्या सुविधांच्या शाश्वत वापरासाठी निर्मलदूतांची निवड करण्यासाठीच्या मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या आहेत.

मुख्य भाग़धारकांमधील दृष्टीकोन आणि आरोग्य सवयीत बदल घडवून आणण्यासाठी संवाद साधन्याचा दृष्टीकोन समोर ठेवून विविध अंतरव्यक्ति संवाद साधनांचा वापर करणे ही तितकेच महत्वाचे आहे. आजपर्यंतच्या विविध संवाद मोहिमेच्या (उत्तम उदा. पोलिओ निर्मूलन) शाश्वत दृष्टीकोनातील व वर्तणूकीत बदल घडवून आणण्यासाठी अंतरव्यक्ती संवाद हे एक प्रभावी माध्यम असल्याचे सिद्ध झाले आहे.

निर्मल भारत अभियानातील माहिती शिक्षण संवाद उपक्रमांतर्गत उपलब्ध करण्यात आलेल्या एकूण निधीच्या ६० टक्के निधीची तरतूद केवळ अंतरव्यक्ती संवादासाठी करण्यात आली आहे. गावपातळीवर व्यक्ती ते व्यक्ती संवाद , गटचर्चा, सभांच्या माध्यमातून संवाद साधण्यासाठी तसेच आवश्यक तो अनुषंगिक पाठपुरावा करण्यासाठी अंतरव्यक्ती संवाद हे एक प्रभावी माध्यम आहे. या माध्यमामुळे व्यक्तीच्या प्रत्यक्ष सवयीत झालेल्या बदलाची पडताळणी करण्यासाठी सहज शक्य आहे.

## उद्देश

गावपातळीवर स्वच्छता संबंधी कामे प्रभावीपणे होण्यासाठी निर्मलदूत निवडीचे उद्देश खालीलप्रमाणे राहतील.

१) गावपातळीवर स्वच्छता व आरोग्याची स्थिती सुधारण्यासाठी, शौचालय बांधकाम करून त्याचा नियमित वापर होण्यासाठी तसेच गाव हागणदारीमुक्त करण्यासाठी संवाद धोरणाच्या अंतरव्यक्ती संवाद व समुदाय गतिशील उपक्रमांचे आयोजन करण्यासाठी प्रशिक्षीत निर्मलदूत विकसित करणे.

२) निर्मल भारत अभियानाचे उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने ग्रामपंचायतीस तांत्रिक सहाय्य करण्यासाठी तसेच गावपातळीवर वंचीत असलेल्या समुदायापर्यंत पोहचून त्यांच्या वर्तणूकीतील बदल घडवून आणून हागणदारी निर्मूलन आणि वैयक्तिक स्वच्छतेसाठी निर्मलदूताची निवड करणे.

३) गावपातळीवर विविध भागधारकांमध्ये उदा. पंचायत राज सदस्य, ग्रामसेवक, पाणीपुरवठा व स्वच्छता समिती सदस्य, जलसुरक्षक, अंगणवाडी सेविका, बचतगट, रोजगार सेवक, बीआरसी यांच्यामध्ये समन्वय साधने.

४) निर्माण झालेल्या स्वच्छता सुविधांची शाश्वतता टिकवून ठेवण्याच्या दृष्टीने शौचालय बांधकामादरम्यान तसेच निर्माण झालेल्या स्वच्छता सुविधांच्या देखभाल दुरुस्ती दरम्यान गुणवत्ता सनियंत्रण करणे.

## धोरण

निर्मलदूत कार्यक्रम अंमलबजावणीसाठीचे ठळक मुद्दे -

१) महाराष्ट्र शासनाच्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने राज्यातील सर्व जिल्हयांसाठी ही मार्गदर्शक सुचना लागू करण्यात येत आहे.

२) या सर्व जिल्ह्यातील १०० कुटुंबापेक्षा जास्त शौचालय नसलेल्या ग्रामपंचायतींचा की ज्यांचा वार्षिक अंमलबजावणी आराखड्यात समावेश करण्यात आला आहे, अशा ग्रामपंचायतीमध्ये या मार्गदर्शक सुचनेचा अवलंब करावा.

३) हा कार्यक्रम जिल्हास्तरावरील मुख्य संसाधन संस्थेच्या मार्फ़त राबविण्यात येईल. जर जिल्हयात मुख्य संसाधन संस्था उपलब्ध नसतील तर या कार्यक्रमाचे व्यवस्थापन व सनियंत्रण तालुकास्तरावरील तालुका संसाधन गटामार्फ़त करण्यात येईल.

४) या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी आवश्यक असणारी सर्व आर्थिक तरतुद जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षातील माहिती, शिक्षण संवाद व मनुष्य संसाधनाअंतर्गत उपलब्ध असलेल्या निधीतून करावयाचा आहे.

५) जिल्हास्तरावरील मुख्य संसाधन संस्था व निर्मलदूत यांच्या क्षमता बांधणीसाठीचे सर्व नियोजन पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) मार्फ़त करण्यात येईल.

६) प्रस्तावित उपक्रमांच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी तसेच निर्मल दूतांच्या दैनंदिन कामाच्या व्यवस्थापनासाठी जिल्हास्तरावरील मुख्य संसाधन संस्था जबाबदार असेल.
या कार्यक्रमाचे संपूर्ण सनियंत्रण करण्याची जबाबदारी जिल्हा पाणी स्वच्छता मिशन कक्षाची राहील. याचा प्रगती अहवाल राज्यस्तरावर पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेस सादर करावा.

## निर्मलदूत निवडीसाठीची कार्यपध्दत

उपरोक्त बाबी साध्य करण्याच्या दृष्टीने निर्मलदूत निवडीसाठी प्रभावी प्रक्रिया पार पाडण्याच्या दृष्टीने खालील पाय-यांचा अवलंब करण्यात यावा.

१) १५० कुटुंबासाठी एक याप्रमाणे ग्रामपंचायतस्तरावर निर्मलदूतांची निवड करण्यात यावी. संबंधित गावातून मुख्य साधन संस्था-३ संभाव्य निर्मलदूतांची निवड यादी तयार करुन त्या त्या गट विकास अधिकाऱ्यांकडे सादर करेल. त्यानंतर निर्मल दूताची अंतिम निवड मुख्य साधन संस्थेचा प्रतिनिधी, जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाचा प्रतिनिधी आणि गट विकास अधिकारी, संबंधित पंचायत समिती या तीन सदस्यांची निवड समिती करेल. निवड समितीचे प्रमुख गट विकास अधिकारी पंचायत समिती हे राहतील.

२) निर्मलदूताची निवड करताना महिलांना प्राधान्य राहील.

३) जर एखदया ग्रामपंचायतीमध्ये अनुसुचीत जाती/ जमातींची कुटूंब संख्या जास्त असेल तर निर्मलदूतांची निवड अनुसुचीत जाती/ जमातींतून करण्यात यावी.

४) जर एका पेक्षा जास्त निर्मलदूतांची निवड करण्यात आली असेल तर गावनिहाय कुटूंबांची यादी तयार करून प्रत्येक निर्मलदूतास त्यांनी संपर्क साधावयाच्या कुटुंबांची जबाबदारी निश्चित करावी.

५) निर्मलदूताने कमीत कमी प्रतीमहा १० लार्भाथ्यांना शौचालय बांधण्यास प्रवृत्त करणे बंधनकारक आहे. प्रति महा १० ते ५० शौचालयाचे बांधकाम पूर्ण झाल्यास रु.१०००/- तसेच प्रती शौचालय रु.१५०/- अशा स्वरुपात मानधन अदा करावे. जर ५० पेक्षा जास्त शौचालयाचे बांधकाम पूर्ण झाल्यास रु.१०००/- मानधन + प्रोत्साहन अनुदान रु.१०००/- तसेच प्रती शौचालय रु.१५०/- अशा स्वरुपात मानधन अदा करावे.जर शौचालय बांधकामाची संख्या १० पेक्षा कमी असल्यास प्रती शौचालय रु.१५०/- प्रमाणे मानधन अदा करावे.

६) गांव हगणदारीमुक्त होईपर्यंत मुख्य संसाधन संस्थेने निवडलेले निर्मलदूत कार्यरत राहतील.

## निवडीसाठी निर्मलदूताची अर्हता /पात्रता

१. किमान इयत्ता आठवी उत्तीर्ण असावा.
२. गावस्तरावरून त्यास स्विकृती असावी तसेच समुदायाशी जवळीकता असावी.
३. त्याच्याकडे उत्तम संवाद कौशल्य असावे.
४. निर्मल दूत त्याच ग्रामपंचायतीचा रहिवाशी असावा
५. निर्मल दूताच्या घरामध्ये शौचालय असावे व तो व त्याच्या कुटुंबातील सर्व सदस्य शौचालयाचा नियमित वापर करणारे असावेत.
६. निर्मल दूत शासनाच्या इतर कोणत्याही कार्यक्रमाशी अथवा कामाशी संबंधित नसावा (उदा. एएनएम, अंगणवाडी सेविका, ग्रामसेवक इ.)
७. निर्मलदूत हा बचत गटातील सदस्य अथवा गवंडी ही असू शकेल.
८. त्याला वैयक्तिक शौचालय बांधकामाविषयीची किमान संकल्पना अवगत असावी.

## विविध भागधारकांच्या भूमिका व जबाबदा-या

निर्मलदूत तसेच या कार्यक्रमांतर्गत सहभागी असलेल्या विविध भागधारकांच्या भूमिका व जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे राहतील.

**पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था**

१) निर्मलदूत कार्यक्रमाची मार्गदर्शक सुचना निर्गमित करणे

२) जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाचे उन्मुखीकरण करणे

३) मुख्य संसाधन संस्थांची क्षमता बांधणी करणे

४) मुख्य संसाधन संस्थेने पाणी व स्वच्छता मिशन कक्षाकडे सादर केलेल्या प्रकल्प प्रस्तावाचे प्रमाणीकरण करणे.

५) सध्याच्या अंतरव्यक्ती संवाद साहित्याचे संकलीकरण करणे व निर्मलदूतांना गावपातळीवर उपयोगात आणता येतील अशा नविन अंतरव्यक्ती संवाद साहित्याची निर्मिती करणे.

६) जिल्हा, तालुका व गावपातळीवर सनियंत्रण पद्धत विकसित करणे.

७) निर्मलदूतांनी अंमलबजावणी केलेल्या उपक्रमांचा नियमित आढावा घेणे

८) जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामार्फ़त मुख्य संसाधन संस्थेस होत असलेल्या निधी वितरणाची खात्री करणे.यशोगाथांचे दस्तावेजीकरण करणे

**जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष**

१) १०० कुटुंबापेक्षा जास्त उघड्यावर हागणदारी असलेल्या ग्रामपंचायतींचा समावेश वार्षिक अंमलबजावणी आराखड्यात करणे.

२) तयार करण्यात आलेल्या पॅनेल मधील मुख्य संसाधन संस्थांची नियुक्ती करणे.

३) अंतरव्यक्ती संवाद तसेच माहिती, शिक्षण संवाद साहित्याची निर्मिती करणे व ते मुख्य संसाधन संस्थेला वितरीत करणे.

४) निर्धारीत कालावधीत निधीचे वितरण करणे

५) मुख्य संसाधन संस्था व निर्मलदूतांच्या कामांचे सनियंत्रण करणे.

**मुख्य संसाधन संस्था**

१) पायाभूत सर्वेक्षण व वार्षिक अंमलबजावणी आराखड्यावर आधारीत प्रकल्प प्रस्ताव तयार करणे व ते पाणी व स्वच्छता मिशन कक्षास सादर करणे.

२) ग्रामपंचायतीच्या सल्ल्याने निर्मलदूतांची निवड करणे.

३) वार्षीक अंमलबजावणी आराखडयात समाविष्ट असलेल्या ग्रामपंचायतींचा हागणदारी निर्मूलन आराखडा तयार करणे.

४) मागणी वाढविण्यासाठी व अंतरव्यक्ती संवाद साधण्यासाठी निर्मलदूतांचे उन्मुखीकरण करणे.

५) गृहभेटी व समुदायस्तरावर विविध उपक्रमांच्या आयोजनासाठी कॉन्टॅक्ट ड्राईव्ह सह निर्मलदूतांसाठी दैनंदिन उपक्रमांचे वेळापत्रक तयार करणे.

६) अंतरव्यक्ती संवाद व आय.ई.सी साहित्य निर्मलदूतांना वितरीत करणे

७) निर्मलदूतांच्या कामांचे सनियंत्रण करणे, देखरेख करणे व आवश्यक त्या ठिकाणी सहाय्य करणे.

८) ग्रामपंचायतीशी सुयोग्य समन्वय साधने.

९) निर्मलदूतांने केलेल्या कामांचे मुल्यमापन झाल्यानंतर मार्गदर्शक सुचनेनुसार निर्मलदूतांना प्रोत्साहन निधी अदा करणे.

१०) ग्रामपंचायतस्तरावर प्रगती अहवाल व आवश्यक अभिलेखे अचूक व अद्यावत असल्याची खात्री करणे.

११) आर्थिक लेखे व प्रगती अहवाल पाणी व स्वच्छता मिशन कक्षास सादर करणे.

**<u>तालुका संसाधन गट</u>**

१) वैयक्तिक शौचालय बांधकामाच्या प्रस्तावास कार्यालयीन मंजूरी देण्याच्या अनुषंगाने आवश्यक ते सहाय्य करणे.

२) लाभार्थींना प्रोत्साहन निधीचे मर्यादित कालावधीत निधीचे वितरण करणे.

३) तालुकास्तरावरील माहिती, शिक्षण आणि संवाद उपक्रमात ग्रामपंचायतींना सहभागी करून घेणे.

४) ग्रामपंचायतस्तरावर प्रक्रिया हाताळणीचे सुलभीकरण करणे.
महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमीयोजनेच्या समन्वयनासाठी योग्य समन्वय साधने.

**<u>ग्रामपंचायत</u>**

१) पात्र निर्मलदूतांच्या निवडीसाठी मुख्य संसाधन संस्थेस सहकार्य करणे.

२) हागणदारी निर्मूलन आराखड्याच्या नियोजन प्रक्रियेत मुख्य संसाधन संस्थेस सहकार्य करणे व तयार झालेल्या आराखड्यास ग्रामसभेची मंजूरी घेणे.

३) निर्मलदूत आपली भूमिका व जबाबदारी योग्य रीतीने पार पाडतील याद्दष्टीने सदर कार्यक्रमाच्या ध्येयपूर्तीसाठी निर्मलदूतांना आवश्यक ते सहकार्य करणे.

४) स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) अंतर्गत गावपातळीवर अंतरव्यक्ती संवाद व समुदाय गतीशील करण्यासाठीच्या उपक्रमात सहभाग घेणे.

५) स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) अंतर्गत गावस्तरावरील सर्व शासकीय विभागांचे प्रतिनिधी या अभियानात सहभागी होत असल्याची खात्री करणे.

**६)** मुख्य संसाधन संस्थेने तयार केलेला तिमाही प्रगती अहवाल ग्राम सेवाकडून प्रमाणित करुन जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षास तसेच पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर कार्यालयास माहतीसाठी सादर करावे.

**<u>निर्मलदूत</u>**

१) ग्रामपंचायतीं अंतर्गत कुटुंबांच्या स्वच्छता स्थितीच्या नोंदी घेणे.

२) मुख्य संसाधन संस्थेस ग्रामपंचायतीचा गावाचा हागणदारी निर्मूलन कृती आराखडा तयार करण्यासाठी सहकार्य करणे.

३) शौचालय बांधकामासाठी मागणी वाढविण्याच्या द्दष्टीने गृहभेटी देणे व वेळोवेळी सामुदायिकस्तरावर विविध उपक्रमांचे आयोजन करणे.

४) गावपातळीवरील सनियंत्रणासाठीची नोंदवही (शौचालयाचे रजिस्टर) अद्यावत ठेवणे.

५) गवंड्यांना एकमेकांशी सुसंवाद करुन शौचालय बांधकामादरम्यान गुणवत्ता संनियंत्रण करणे.

६) गाव हागणदारी मुक्त होईपर्यंत गावपातळीवर स्वच्छता दिनाचे आयोजन करण्यासाठी ग्रामपंचायतीस प्रवृत्त करणे.

## निर्मलदूत व्यवस्थापनासाठी संघ रचना

### एका तालुक्यासाठी आवश्यक मनुष्य बळाची संरचना

१) एका पर्यवेक्षकामार्फत १५ ते १७ गावे हाताळली जातील, व १ समन्वयक एकूण ५० गावे हाताळत असलेल्या ३ पर्यवेक्षकांचे संनियंत्रण करेल. सदर चमूची निवड करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य साधन संस्थे ची राहील. या व्यतिरीक्त मुख्य साधन संस्थांकडे असलेल्या इतर स्टाफ़ आवश्यक त्यावेळी सहकार्य करेल. तालुका संसाधनाची देखील या कामी सहकार्य करण्याची जबाबदारी राहील.




## प्रोत्साहनात्मक मानधन देण्याची पध्दत

निर्मलदूत गावपातळीवर स्वच्छता व आरोग्यासंबंधी आवश्यक वर्तणूक बदल घडवून आणण्यात सातत्याने प्रयत्न करतील. गावपातळीवर गृहभेटीद्वारे व समुदाय गतिशील करण्याच्या दृष्टीने अंतरव्यक्ती संवाद साधतील व त्याच बरोबर विविध उपक्रमांचे आयोजन ही करतील. सदर उपक्रमांच्या अंमलबजावणी दरम्यान ग्रामपंचायत सदस्य, ग्रामसेवक, पाणी पुरवठा समितीचे सदस्य यांचे सहकार्य घेतील.

निर्मलदूतांच्या गावपातळीवरील भूमिका व जबाबदाऱ्या लक्षात घेता त्यांना द्यावयाचे मानधन व प्रोत्साहनासाठी खालील पायऱ्यांचा अवलंब करण्यात यावा.

१. निर्मलदूताने एखाद्या कुटुंबास शौचालय बांधकामासाठी प्रेरीत करुन सबंधित कुटुंबांकडून शौचालय बांधून घेतल्यानंतर साधारण १ महिना सदर कुटुंबाने शौचालयाचा वापर केल्यास निर्मलदूतास मानधन अदा करावे.

२. कुटुंबाने शौचालय बांधून त्याचा वापर सुरु केल्या संबंधीचा अहवाल सादर झाल्यानंतर निर्मलदूतांना प्रती शौचालय रु.१५०/- प्रमाणे मानधन अदा करावे.

३. या व्यतिरिक्त निर्मलदूतास प्रतिमहा १० शौचालय बांधून पूर्ण झाल्यानंतर दरमहा रु.१०००/- प्रमाणे १२ महिन्याकरिता अदा करावे.

४. सदर मानधन निर्मलदूताने मासिक प्रगती अहवाल सादर केल्यानंतरच अदा करावे.

५. सदर मानधन निर्मलदूताने अहवाल सादर केल्यानंतर २० दिवसाच्या आत अदा करावे.

६. गाव हागणदारीमुक्त झाल्यानंतर द्यावयाचा प्रोत्साहन निधी

*गाव हागणदरी मुक्त झाल्याचे जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाने प्रमाणित केल्यानंतर निर्मलदूतास रु.१०००/- अतिरिक्त प्रोत्साहन मानधन अदा करावे.

७. हागणदारी निर्मूलनातील सातत्य टिकविल्यानंतर द्यावयाचा प्रोत्साहन निधी.

*गाव हागणदारीमुक्त झाल्यानंतर जर गावाने ६ महिने गावातील लोकांनी वैयक्तिक शौचालयाचा वापर व सातत्य टिकवून ठेवल्यास व जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाच्या पडताळणीत तसे निष्पन्न झाल्यास निर्मलदूतास रु.२०००/- अतिरिक्त प्रोत्साहन निधी वितरीत करण्यात यावा.

८. पंचायत समिती व ग्रामपंचायत मार्फत ३ महिन्याचे उद्दिष्ट देण्यात यावे. दिलेले उद्दिष्ट पूर्ण न होणाऱ्या ग्रामपंचायती मध्ये ३ महिन्यानंतर निर्मलदूतास अपात्र ठरवून, निवड रद्द करण्यात यावी.

**निधीची तरतूद**

स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण)अंतर्गत (निर्मल भारत अभियानांतर्गत) जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाकडे उपलब्ध असलेल्या माहिती, शिक्षण व सवाद निधीतून निर्मलदूत कार्यक्रमासाठी निधीची तरतूद करण्यात यावी. या कार्यक्रमासाठी आवश्यक असणारा निधी मुख्य संसाधन संस्थेमार्फत खर्च करण्यात यावा.

**क्षमता बांधणी आराखडा**

वर्तणूक बदलासाठीच्या संवाद धोरणानुसार तयार करण्यात आलेलया आराखडयाची ग्राम/समुदाय स्तरावर अंमलबजावणी करण्यात निर्मल दूताची भूमिका अत्यंत महत्वाची आहे. वर्तणूक बदलासाठीचा संवाद परिणामकारक व्हावा यासाठी निर्मल दूताची क्षमता तयार होणे देखील तितकेच महत्वाचे आहे.

राज्यात निर्मल दूताच्या नेमणूकीनंतर त्यांचेसाठी दोन दिवसीय प्राथमिक प्रशिक्षणाचे आयोजन केले जाईल. सदर आयोजन जिल्हा पाणी आणि स्वच्छता मिशनने तालुका अथवा जिल्हास्तरावर केले जाईल. यासाठीचे प्रशिक्षण प्रारुप (Module) जिल्हा पाणी आणि स्वच्छता मिशन अथवा पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थांकडून तयार करुन देण्यात येईल.

निर्मल दूतांच्या क्षमता संवर्धनासाठी खालील प्रकारच्या प्रशिक्षणांचे आयोजन करण्यात येईल.

- निर्मल भारत अभियान संकल्पना, महत्व, घटक आणि कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत निर्मल दुतांची भूमिका याविषयीचे दोन दिवशीय प्रशिक्षण.
- हागणदारी निर्मूलन कृती आराखडा संकल्पना आणि त्याअनुषंगाने ग्रामस्तरावर करावी लागणारी प्राथमिक तयारी याविषयीची एक दिवशीय कार्यशाळा.
- अंतरव्यक्ती संवाद संकल्पना, संवादासाठीच्या साधनांची निवड, संपर्क अभियानासाठीचा आराखडा तयार करणे, समुदाय संघटण, लक्षित गट चर्चेचे आयोजन, जाणीव जागृती अभियानाचे प्रात्यक्षिक इत्यादीवर भर दिला जाईल. सदर प्रशिक्षण दोन दिवशीय कालावधीचे असेल.
- शौचालय बांधकामातील तांत्रिक बाबी आणि बांधकामादरम्यानचे गुणवत्ता नियंत्रण विषयी एक दिवशीय कार्यशाळा.
- शौचालय बांधकामातील तांत्रिक बाबी आणि अंतरव्यक्ती संवाद विषयी प्रत्येकी एक दिवशीय उजळणी प्रशिक्षणाचे आयोजन केले जाईल.

या सर्व प्रशिक्षणाच्या आयोजनामध्ये सहभागीय पध्दतीचा अवलंब केला जाईल. उदा. गट चर्चा, क्षेत्रिय कार्य आणि प्रात्यक्षिकांचा यामध्ये समावेश असेल.

निर्मल दूत कार्यक्रमाचे पर्यवेक्षण आणि संनियंत्रण जिल्हा मुख्य संसाधन संस्थेव्दारे केले जाईल. या दरम्यान संबंधित संस्थेव्दारे निर्मल दूतांना कामाचे पर्यवेक्षण आणि सनियंत्रणाबाबत मार्गदर्शन केले जाईल.

निर्मल दूतांना अंतरव्यक्ती संवाद साधण्यासाठी प्रशिक्षण दरम्यान संसाधन कीट देण्यात येईल यामध्ये प्रामुख्याने खालील बाबींचा समावेश असेल.

- ओळखपत्र ( **खालील प्रमाणे ओळखपत्राचा नमुना जिल्हा साधन संस्थाने दयावा.**)

| {संबंधीत जिल्हा साधन संस्थेचे नाव व पत्ता} | |
|---|---|
| नावः- ---------------------------------------------------- | निर्मलदूताचा फोटो |
| पदः- ---------------------------------------------------- | |
| कार्यक्षेत्र :- ------------------------------------------- | |
| पत्ता :- ------------------------------------------------ | |
| निर्मलदूताची सही | सचिव / अध्यक्ष |
| | (जिल्हा साधन संस्थांचे नांव) |

- युनिफॉर्म (ॲप्रण, टोपी, बॅग)
- प्रचार प्रसिध्दी साहित्य

- फलीप बुक, पोस्टर्स, फलॅश कार्ड, खेळ इत्यादीसारखी आंतरव्यक्ती संवादाची साधन
- शौचालय बांधकामाची तांत्रिक माहितीपुस्तिका इ.
- हिरवा, पिवळा, लाल रंगाची स्टीकर्स (संबंधीत गावातील कुटुंबाकडे वैयक्तिक शौचालय नसल्यास लाल रंगाचे स्टीकर्स घराला लावावे, कुटुंबाकडे वैयक्तिक शौचालय उपलब्ध असून कुटुंबातील सर्व सदस्यांकडून वापर होत नसल्यास पिवळया रंगाचे स्टिकर्स घराला लावावे आणि कुटुंबाकडे वैयक्तिक शौचालयाचे बांधकाम पुर्ण करुन कुटुंबातील सर्व सदस्यांनी शौचालयाचा वापर करणाऱ्या कुटुंबाच्या घराला हिरव्या रंगाचे स्टीकर्स घराला लावावे.)

ज्या जिल्हा संसाधन सस्था निर्मलदूत कार्यक्रमात सहभागी होतील, त्या संस्थासाठी राज्यस्तरावरुन दोन वेगवेगळया प्रशिक्षणांचे आयोजन केले जाईल. यामध्ये प्राथमिक प्रशिक्षण आणि विषयांकीत प्रशिक्षणाचा समावेश असेल. या प्रशिक्षणांचे प्रारूप राज्यस्तरीय पाणी आणि स्वच्छता सहाय्य संस्था आणि राज्य स्तरीय संसाधन संस्था तयार करतील.

तीन दिवशीय कालावधीचे प्राथमिक प्रशिक्षण राज्य स्तरावरुन घेण्यात येईल. यामध्ये प्रशिक्षणार्थी म्हणून जिल्हा संसाधन संस्थेतील कार्यक्रम समन्वयक आणि पर्यवेक्षक सहभागी होतील. या प्रशिक्षणामध्ये प्रामुख्याने कार्यक्रमाची संकल्पना, घटक, देखरेख आणि संनियंत्रण इ. संत्रांचा समावेश असेल.

विषयानुरूप प्रशिक्षण दोन दिवशीय कालावधीचे असेल, यामध्ये प्रामुख्याने अंतरव्यक्ती संवाद आणि शौचालयाची तांत्रिक माहिती या सत्रांचा समावेश असेल.

## संनियंत्रण आणि अहवाल लिखाण

संनियंत्रण प्रणालीव्दारे पर्यवेक्षकाकडून निर्मल दूताच्या कामाचे संनियंत्रण करता येईल. सनियंत्रणासाठीचे प्रपत्र परिशिष्टामध्ये जोडले आहे.

जिल्हास्तरीय मुख्य संसाधन संस्थेतील पर्यवेक्षण आणि समन्वयक निर्मल दुतांचा मासिक आढावा बैठकीव्दारे, उपक्रमांचे संनियंत्रण आणि कामाची प्रगती बाबत निर्मल दूतांना सहाय्य करतील.

निर्मल दूत त्यांच्या कामाचा मासिक अहवाल सोबत जोडलेल्या प्रारूपाप्रमाणे पर्यवेक्षकाकडे सादर करतील. निर्मल दूतांसाठी तयार करण्यात येणाऱ्या नोंदवहीव्दारे त्यांनी केलेले काम आणि आयोजित केलेल्या उपक्रमांची माहिती मिळेल.

निर्मल दूतांने केलेले काम आणि सादर केलेले अहवाल याची पडताळणी करण्यासाठी तालुकास्तरीय पर्यवेक्षकासाठी तपासणी सुची तयार करण्यात आलेली आहे. याव्दारे तालुकास्तरीय पर्यवेक्षक निर्मल दूताच्या कामांची पडताळणी करू शकतील सदर तपासणी सुची परिशिष्टामध्ये जोडलेली आहे.

**उपक्रम आराखडा आणि दस्तऐवजीकरण:**

निर्मल दुताने वर्षभर करावयाच्या कामाचा उपक्रम आराखडा तयार करण्यात आलेला असुन त्यामुळे निश्चित वेळेत कोणते काम करावयाचे या विषयीची स्पष्टता येईल यासाठीचे प्रारूप परिशिष्टमध्ये जोडले आहे.

पाणी आणि स्वच्छता संस्थेव्दारे कामांच्या यशोगाथा / केस स्टडीजचे दस्तऐवजीकरण केले जाईल. कार्यक्रमाच्या अंमलबजावणीपूर्वी वासोव्दारे यासाठीचे फॉरमॅट तयार करण्यात येईल. ग्रामस्तरीय कामांची प्रगती फोटोग्रॅप्सव्दारे निर्मलदूत आणि पर्यवेक्षक डॅाक्युमेंट करतील.

## निर्मल दूत कार्यक्रमाचा उपक्रम आराखडा

### निर्मल दूत कार्यक्रमाचा सर्वसाधारण उपक्रम आराखडा

| अ. क्र. | उपक्रम | तपशील | महिने | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| १ | अमंलबजावणी चमूची निवड आणि नियुक्ती | कार्यक्रमाच्या अंतलबजावणीसाठी एक समन्वयक आणि ३ पर्यवेक्षक यांची नियुक्ती करणे | | | | | | | | | | | | |
| २ | गावांची निवड | चालू वर्षाच्या वार्षिक कृती आराखडयातील ५० गावांची कार्यक्रमासाठी निवड करणे | | | | | | | | | | | | |
| ३ | निर्मल दुतांची निवड | ग्रामसभेच्या मंजूरीव्दारे निर्मल दूतांची निवड करणे | | | | | | | | | | | | |
| ४ | प्राथमिक प्रशिक्षण | निर्मल भारत अभियान संकल्पना, महत्व, घटक, निर्मल दूत कार्यक्रमाचा तपशील आणि निर्मल दूतांच्या भूमिका व जबाबदाया विषयी दोन दिवशीय प्रशिक्षण | | | | | | | | | | | | |
| ५ | हागणदारी निर्मूलन कृती आराखडा तोंडओळख कार्यशाळा | हागणदारी निर्मूलन कृती आराखडा निर्मिती प्रक्रिया विषयक एक दिवशीय कार्यशाळा | | | | | | | | | | | | |
| ६ | हागणदारी निर्मूलन कृती आराखडा नियोजन प्रक्रिया | हागणदारी निर्मूलन कृती आराखडा निर्मितीसाठी ५० गावामधून नियोजन प्रक्रियेची अंतलबजावणी करणे | | | | | | | | | | | | |
| ७ | वर्तणूक बदलासाठीची | आंतरव्यक्ती संवाद संकल्पना, अंतरव्यक्ती | | | | | | | | | | | | |

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | संवाद कौशल्य | संवादाच्या साधनांची निवड आणि उपयोग, गृहभेट कार्यक्रमाची संकल्पना आणि रूपरेखा विषयी प्रशिक्षण | | | | | | | | | | | | |
| ८ | शौचालय बांधकामातील तांत्रिक बांबी | शौचालय बांधकामातील तांत्रिक बांबीविषयी एक दिवशीय प्रशिक्षण | | | | | | | | | | | | |
| ९ | मासिक बैठक | कार्यक्रामाची प्रगती, अंमलबजावणीतील अडचणी आणि त्यावरील उपाययोजनां याबाबत मार्गदर्शनासाठी मासिक बैठकीचे आयोजन | | | | | | | | | | | | |
| १० | स्वच्छता दिवस | प्रत्येक महिन्याच्या पहिल्या आठवडयात ग्रामस्तरावर स्वच्छता दिवस साजरा करणे. यामध्ये स्वच्छतेच्या कामासाठी श्रमदान, वैयक्तिक शौचालय उभारणी केलेल्या कुटुंबांचा गौरव, त्याचप्रमाणे स्वच्छतेच्या कामांचा आढावा घेऊन पुढील महिन्याचे नियोजन करणे | | | | | | | | | | | | |
| ११ | अंतरव्यक्ती सवांद सांधन विषयी उजळणी प्रशिक्षण | निर्मल दूतांसाठी अंतरव्यक्ती संवाद साधनबाबत एक दिवशीय उजळणी प्रशिक्षणाचे आयोजन करणे | | | | | | | | | | | | |
| १२ | शौचालय बांधकामातील तांत्रिक बांबी | शौचालय बांधकामातील तांत्रिक बांबीविषयी एक दिवशीय उजळणी प्रशिक्षण वर्गाचे आयोजन करणे | | | | | | | | | | | | |
| १३ | हागणदारी निर्मूलन कृती आराखडयांचे | वैयक्तिक शौचालय बांधकाम आणि वापरासाठी नियमित | | | | | | | | | | | | |

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | संनियंत्रण | संनियंण करणे | | | | | | | | | | | | |
| १४ | शौचालय बांधकामाचा दर्जा टिकविण्यासाठी सनियंत्रण करणे | वैयक्तिक शांचालयच्या बांधकामा दरम्यान नियमित संनियंण करणे | | | | | | | | | | | | |
| १५ | माहिती प्रणालीसाठी नियमित नोंदी घेणे | कामाच्या प्रगती बाबत नोंदी अदयावत ठेवण | | | | | | | | | | | | |

## क्षेत्रिय नोंदवही – कुटुंबस्तर

| अ. क्र. | कुटुंब प्रमुखाचे नाव | प्रवर्ग | पायाभूत सर्वेक्षणानुसार शौचालय सुविधांची उपलब्धतता (होय /नाही) | पायाभूत सर्वेक्षणानुसार कुटुंबातील सर्व सदस्यांकडून शौचालयाचा वापर (होय /नाही) | शौचालय सुविध नसलेली कुटुंब | | शौचालय वावर सुरू दिनांक | पात्र असल्यास अनुदान/प्रोत्साहन रक्कम प्राप्त दिनांक | | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | बांधकामाची सुरूवात दिनांक | बांधकाम पूर्ण दिनांक | | निर्मल भारत अभियान | महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना | |
| १ | | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | | |

## क्षेत्रिय नोंदवही – ग्रामस्तरावरील उपक्रम

| अ. क्र. | दिनांक | कालावधी | उपक्रम | तपशील | ठिकाण | सहभागी | | सुलभ कर्ता | फलीत | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | उपस्थितांचा प्रकार | संख्या | | | |
| १ | | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | | |

## गावभेट नोंदवही

| अ.क्र. | दिनांक | भेट देणाऱ्याचे नाव | पत्ता आणि संपर्क क्रमांक | प्रतिक्रिया आणि सही |
|---|---|---|---|---|
| १ | | | | |
| २ | | | | |
| ३ | | | | |
| ४ | | | | |

## मासिक प्रगती अहवाल –

अ) कुटुंबस्तर

| अ.क्र. | एकुण कुटुंब संख्या | कुटुंब स्तरावरील स्वच्छता सुविधा | | | | कुटुंब स्तरावरील स्वच्छता सुविधांचा वापर | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | महिन्याच्या सुरूवातीस शौचालय असलेल्या कुटुंबांची संख्या | महिन्याच्या अखेरीस शौचालय असलेल्या कुटुंबांची संख्या | महिन्यातील प्रगती | एकूण प्रगती | महिन्याच्या सुरूवातीस शौचालयाचा वापर करणाऱ्या कुटुंबांची संख्या | महिन्याच्या अखेरीस शौचालयाचा वापर करणाऱ्या कुटुंबांची संख्या | महिन्यातील प्रगती | एकूण प्रगती |
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |

ब) गावस्तरावरील उपक्रम –

| अ.क्र | दिनांक | कालावधी | उपक्रम | उद्देश | ठिकाण | सहभागी | सहभागींची संख्या | उपक्रमाचा तपशील | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | |

## पर्यवेक्षकाची तपासणी सुची – संनियंत्रण नमुना प्रपत्र

**पर्यवेक्षकाचे नाव:** **संनियंत्रण कालावधी:**

**दिनांक:**

**गाव:** **ग्रामपंचायत:** **तालुका :**

**जिल्हा:**

| अ.क्र. | निर्मल दुताचे नाव | पर्यवेक्षकाच्या भेटीचा दिनांक | क्षेत्रिय नोंदवही पूर्ण असून अचूकपणे नोंदी घेतलेल्या आहेत (होय/नाही) | जर नाही असेल तर काय प्रकारच्या सुधारणा आवश्यक वाटतात | शौचालय बांधकामाची संख्या अहवालात अचूकपणे नोंदविलेली आहे | जर नाही तर पर्यवेक्षकाने काय कार्यवाही केली | कुटुंब स्तरवरील अं◌ातरव्यक्ती संवादाचे उपक्रम निर्मल दुताव्दारे नियमितपणे घेतले जातात (होय/नाही) १० | निर्मल दुतांनी आंतरव्यक्ती संवादासाठी वापरलेले तंत्र परिणामकारक आहे का ? (होय /नाही) नोंद वहीत १० | निर्मल दूतांनी भेट दिलेल्या कुटुंबाच्या वर्तणुकीत काही बदल दिसतात का? (होय/ नाही) १० टक्के नमुना दाखल कुटुंबांना भेट देऊन खात्री करणे | निर्मल दुतांच्या प्रयत्नातून वैयक्तिक शौचालय बांधकामाचा निर्णय केलेली कुटुंब आहेत का? (होय/नाही) | निर्मल दुतांनी नोंदविलेल्या बैठकांची संख्या योग्य आहे का? (होय/नाही) तपासून खात्री करणे | अंतर वक्ती संवादासाठी निर्मल दुतांना देण्यात आलेल्या संच पेटीचा उपयोग केला जातो का ? (होय / नाही) | साहित्याचा वापर करताना येणाऱ्या अडचणी | निर्मल दुतांचे ज्ञान १.अति उत्तम २. उत्तम ३.साधारण | निर्मल दुतांचे कौशल्ये १.अति उत्तम २. उत्तम ३.साधारण | प्रशिक्षणाची आवश्यकता असल्यास स्पष्ट करा | पर्यवेक्षकाचा अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |

राज्य मुख्य साधन संस्थांसाठी करारनामा

**पाणी आणि स्वच्छता सहाय्य संस्था, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई**

**आणि**

**---------------------------------------------------------------------------**
**------------------------ ----यांचे दरम्यानचा** सामंजस्य **करार**

**करारनामा**
**ग्रामीण पाणी पुरवठा आणि स्वच्छता कार्यक्रमाग्माठी राज्य साधन संस्थांसाठीचा सामंजस्य करार)**

सदर सामंजस्य करार **पाणी आणि स्वच्छता सहाय्य संस्था, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई** (यांचा उल्लेख **पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था"** म्हणून करण्यात येईल) आणि **---------------------------------------** **(यांचा** उल्लेख **राज्य साधन संस्था** म्हणून करण्यात येईल) यांच्या दरम्यान दिनांक ---------------------- रोजी ----------------------------------------------------------------------, ------- येथे करण्यात आला.

**अटी व शर्ती :**

१) सदर कराराच्या माध्यमातून राज्य साधन संस्था राज्याच्या पाणी व स्वच्छता विभागाच्या पाणी व स्वच्छता साहाय्य संस्थेने निर्धारित केलेल्या विविध उपक्रमात सहभागी होवू शकतील

२) ह्या सामंजस्य कराराचा कालावधी दि १ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयाप्रमाणे निर्धारित कालावधी पुरता असेल

३) या कराराद्वारे दि १ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयाप्रमाणे निर्धारित केलेली दर निश्चिती व कार्यपद्धती दोन्ही पक्ष्यांना मान्य आहे

४) या कराराद्वारे पुढील कालावधीत राज्य साधन संस्थांचा सर्वार्थाने संचलित व नियंत्रित करण्याचे सर्व अधिकार पाणी व स्वच्छता साहाय्य संस्थेकडे राहतील

५) राज्य साधन संस्था राज्याच्या पाणी व स्वच्छता विभागाच्या पाणी व स्वच्छता साहाय्य संस्थेने निर्धारित केलेल्या विविध उपक्रमात सहभागी होताना उपक्रमाच्या आवश्यकते नुसार करार करणे अनिवार्य राहील

६) राज्य साधन संस्था आणि पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांच्यामध्ये कुठल्याही प्रकारचे वाद उद्भवल्यास व प्रकरण न्याय प्रविष्ट झाल्यास त्यासाठी न्यायालयीन कार्यक्षेत्र केवळ मुंबई हे असेल.

७) उपक्रमांच्या अंमलबजावणीमध्ये कसूर झाल्यास, उपक्रमाच्यावेळी केलेल्या करारनाम्यामध्ये असलेल्या अटी व शर्तींचा भंग केल्यास सदर संस्थेला करारनामा रद्द करून शासन स्तरावरून काळ्या यादीत समाविष्ट केले जाईल.

स्थळ: नवी मुंबई
दिनांक: / /२०१५

**पहिला पक्ष**
पाणी आणि स्वच्छता मिशन कक्ष, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई

(मा. श्री. -------------------------------------------- पद: -------------------------

**दुसरा पक्ष**

--------------------------------------------------------------------- अध्यक्ष / सचिव

(मा. श्री. -------------------------------------------- पद: -------------------------

**साक्षीदार**

१) नाव --------------------------------------------------- सही -------------------

२) नाव ---------------------------------------------------- सही -----------------

जिल्हा मुख्य साधन संस्थांसाठी करारनामा

जिल्हा ***पाणी*** **व *स्वच्छता*** मिशन, जिल्हा **______________________**

**आणि**

-----------------------------------------------------------------------------------------------------

-------------------------------**यांचे *दरम्यानचा*** सामंजस्य ***करार***

**करारनामा**

**(ग्रामीण पाणी पुरवठा आणि स्वच्छता कार्यक्रमासाठी जिल्हा मुख्य साधन संस्थांसाठीचा सामंजस्य करार)**

सदर सामंजस्य करार जिल्हा ***पाणी*** **व *स्वच्छता*** मिशन, जिल्हा **______________________** आणि **---------------------------------------(यांचा** उल्लेख **जिल्हा साधन संस्था** म्हणून करण्यात येईल) यांच्या दरम्यान दिनांक ----------------------- रोजी ------ ----------------------------------------------------------------------, ------- येथे करण्यात आला.

**अटी व शर्ती :**

१) सदर कराराच्या माध्यमातून जिल्हा साधन संस्था जिल्ह्याच्या पाणी व स्वच्छता मिशन कक्ष, जिल्हा परिषद ______________ यांनी निर्धारित केलेल्या विविध उपक्रमात सहभागी होवू शकतील.

२) ह्या सामंजस्य कराराचा कालावधी दि १ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयाप्रमाणे निर्धारित कालावधी पुरता असेल

३) या कराराद्वारे दि १ सप्टेंबर २०१४ च्या शासन निर्णयाप्रमाणे निर्धारित केलेली दर निश्चिती व कार्यपद्धती दोन्ही पक्ष्यांना मान्य आहे

४) या कराराद्वारे पुढील कालावधीत जिल्हा साधन संस्थांचा सर्वार्थाने संचलित व नियंत्रित करण्याचे सर्व अधिकार जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष, जिल्हा परिषद ______________ यांचेकडे राहतील.

५) जिल्हा साधन संस्था जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षाने निर्धारित केलेल्या विविध उपक्रमात सहभागी होताना उपक्रमाच्या आवश्यकते नुसार करार करणे अनिवार्य राहील

६) जिल्हा साधन संस्था आणि जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष यांच्यामध्ये कुठल्याही प्रकारचे वाद उद्भवल्यास व प्रकरण न्याय प्रविष्ट झाल्यास त्यासाठी न्यायालयीन कार्यक्षेत्र संबंधित जिल्ह्याचे मुख्यालय असेल.

७) उपक्रमांच्या अंमलबजावणीमध्ये कसूर झाल्यास, उपक्रमाच्यावेळी केलेल्या करारनाम्यामध्ये असलेल्या अटी व शर्तींचा भंग केल्यास सदर संस्थेला करारनामा रद्द करून शासन स्तरावरून काळ्या यादीत समाविष्ट केले जाईल.

**स्थळ:**
**दिनांक: / /२०१५**

**पहिला पक्ष**
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद _________________

**दुसरा पक्ष**
------------------------------------------------------------------- अध्यक्ष / सचिव
(मा. श्री. ------------------------------------------- पद: -------------------------

**साक्षीदार**
१) नाव -------------------------------------------------- सही -------------------

२) नाव ---------------------------------------------------- सही -----------------

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०९१४३९४२७६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Kumar

Digitally signed by Rajesh Kumar
DN: CN = Rajesh Kumar, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2015.01.17 17:57:03 +05'30'

राजेश कुमार
प्रधान सचिव

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र शासन यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खासगी सचिव.
३. मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे खासगी सचिव.
५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. जिल्हाधिकारी (सर्व)
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
८. महासंचालक, आरोग्य महासंचालनालय, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, वासो (WSSO).
११. संचालय, नगरपालिका प्रशासन, वरळी, मुंबई.
१२. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१३. विभागीय आयुक्त (सर्व).
१४. उपसचिव (सर्व),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१६. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१७. प्रकल्प व्यवस्थापक, जलस्वराज्य- II, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (RSPMU),बेलापुर, नवी मुंबई.
१८. उपायुक्त (विकास) (सर्व) विभागीय आयुक्त कार्यालय.
१९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद (सर्व).
२०. उप प्रकल्प व्यवस्थापक (स्वच्छता), जिल्हा परिषद (सर्व).
२१. सर्व कार्यासने, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२२. निवड नस्ती (पापु-०८).